**माहितीचा अधिकार अधिनियमाच्या प्रभावी अंमलबजावणी संदर्भात ऑगस्ट २००९ च्या <u>अंतिम सप्ताहात विशेष मोहिम राबविणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक - केंमाअ - २००९ / प्र.क्र. ९४ /६-स,**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक - ११ ऑगस्ट, २००९.**

## परिपत्रक

**वाचा :-**

शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग क्रमांक - केमाअ-२००९/६३१/प्र.क्र.२६७/०९/सहा, दिनांक - २४ जुलै,२००९.

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ हा कायदा दिनांक १२/१०/२००५ पासून अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम ४(१) (क) मधील तरतुदीप्रमाणे प्रत्येक सार्वजनिक प्राधिकारणाने सर्व अभिलेख योग्य रीतीने सूचीबध्द करुन त्याची निर्देश सूची तयार करणे व संगणकीकरण करणे शक्य असेल अशा अभिलेखांचे वाजवी कालावधीत व साधन संपत्तीच्या उपलब्धतेनुसार संगणीकरण करणे व ही माहिती नेटवर्कवर उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. कलम ४(१) (ख) मधील तरतूदीनुसार हा अधिनियम अधिनियमित झाल्यापासून १२० दिवसांच्या आत १७ बाबींबरिल माहिती तयार करुन तो प्रसिध्द करणे आवश्यक होते. तसेच सदर माहिती वेळोवेळी अद्ययावतही करणे आवश्यक आहे. कलम ५ (१) व ५ (२) मधील तरतूदी पाहता सार्वजनिक प्राधिकरणांनी आवश्यक असतील तेवढया जास्तीत जास्त अधिका-यांना राज्य जन माहिती अधिकारी व प्रथम अपीलीय अधिकारी म्हणून निर्देशित करणे आवश्यक आहे. शासनाने या कार्यवाहीबाबत वेळोवेळी सूचना निर्गमित केलेल्या आहेत.या उपरांत जनतेकडून या संदर्भात तक्रारी प्राप्त होत आहेत.दैनंदिन कामकाजाच्या व्यापामुळे अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे इ.कामे सार्वजनिक प्राधिकारणांनी पूर्ण न केल्याने माहिती पुरविण्यात विलंब होतो असे निर्देशनास आले आहे.

अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे या बाबींचे दीर्घकालीन महत्व विचारात घेता या कामासाठी विशेष मोहिम राबवून ते प्राथम्याने पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. याबाबत शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - २००९/ ६३१/ प्र.क्र.२६७/ ०९/ सहा, दिनांक २४ जुलै, २००९ अन्वये आदेश देण्यात आले आहेत. या आदेशाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

(१) सर्व विभागीय सार्वजनिक प्राधिकारणांनी ऑगस्ट २००९ मधील अंतिम सप्ताह हा अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे ही कामे या विशेष मोहिमे अंतर्गत प्राथम्याने हाती घ्यावीत. कार्यालयातील सर्व अभिलेख्यांची निंदणी, विगतवारी करून ते सर्व सूचीबध्द करण्यात यावेत व त्यांच्या निर्देशसूच्या तयार करण्यांत याव्यात, तातडीच्या व अत्यावश्यक दैनंदिन बाबींकडे या मोहिमेमुळे दुर्लक्ष होणार नाही यांचीही दक्षता त्यांनी घ्यावी.

(२) ज्या सार्वजनिक प्राधिकरणांनी अद्याप कलम - ४ च्या तरतूदींना अपेक्षित १७ बाबींवरिल माहिती तयार करून जनतेकरिता उपलब्ध केलेली नाही व शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द केलेली नाही. तसेच सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिका-यांना निर्देशित करून त्यांचे फलक दर्शनी ठिकाणी लावले नाहीत अशा सार्वजनिक प्राधिकरणांनी कोणत्याही परिस्थितीत **दिनाक ३१/८/२००९ पर्यन्त अशी कार्यवाही पूर्ण**

**करावी. दिनांक ३१/८/२००९ नंतर याबाबत जनतेकडून तक्रार प्राप्त झाल्यास संबंधिताविरुध्द कठोर कार्यवाही करण्याची व संबंधित कार्यालय प्रमुखांच्या गोपनीय अहवालात तशी नोंद घेण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.**

(३) सर्व सार्वजनिक प्राधिकारणांनी त्यांच्या कार्यालयाच्या १०० टक्के अनुपालनासंदर्भातील संकलित अहवाल **दिनांक ३१/८/२००९** पर्यन्त शासनास पाठवावा. सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी यादी व त्यांच्या कार्यपूर्तते बाबतची नोंद त्यात असणे आवश्यक राहील.

(४) या शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने करण्यात आलेल्या कार्यवाहीचा आढावा अहवाल सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी या विभागाकडे कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३१.८.२००९ पर्यंत सादर करावा.

(५) हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेसाईटवर संगणक संकेतांक क्रमांक २००९०८१११६४६२३००१ वर प्रसिध्द करण्यात आलेले आहेत.

**महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(क.कि.पारकर)**
**शासनाच्या उप सचिव.**

प्रत,

१) सहसचिव / सर्व उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२) वि.का.अ., सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
३) सर्व अवर सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
४) सर्व कार्यासन अधिकारी / कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
५) प्रधान सचिव (सहकार व पणन व वस्त्रोद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) साखर आयुक्त, साखर संकुल, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक,महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ,लोटस हाऊस,३३ए,सर विठ्ठलदास ठाकरसी मार्ग, -मुंबई-२०.
९) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,उमरेड रोड, नागपूर-४४०००९०(प्रादेशिक, नागपूर, सोलापूर)
१०) संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, वाशानी चेंबर्स, ४७ सर विठ्ठलदास ठाकरसी मार्ग, -मुंबई २०
११) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, एम.एस.एच.सी. कॉम्पेक्स, उमरेड रोड, नागपूर-४४० ००९
१२) संचालक पणन, पणन संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) संचालक, महाराष्ट्र गृहनिर्माण वित्तीय महामंडळ, हाऊसिंग भवन, प्लॉट नं. सी २१, ई ब्लॉक,-बांद्रा -कुर्ला कॉम्ल्पेक्स, रिझर्व्ह बँकेच्या मागे, मुंबई-५१.
१४) व्यवस्थापक,महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, ५८३बी, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे-३७.
१५) माहिती अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कानमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट, मुंबई-९.
१६) संचालक रेशीम, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर, द्वारा- महाराष्ट्र राज्य हातमाग -महामंडळ, एम.एस.एच.सी. कॉम्पेक्स, उमरेड रोड, नागपूर-४४०००९.
१७) सरव्यवस्थापक,महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, खेतान भवन, मुंबई-२०.